**मंदिरात प्राप्त होणाऱ्या निर्माल्यापासून सुगंधी द्रव्ये/ वस्तु बनविण्यासाठी राज्यस्तरीय नोडल अधिकारी नियुक्त करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५९/का-१०

नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख-१९ जून, २०१८.

वाचा :-

डॉ.सतबीर बेदी, सदस्य सचिव, राष्ट्रीय महिला आयोग यांचे पत्र क्र.२०/१०/१/२०१८/NCW (WWC),दि.०६ एप्रिल, २०१८.

प्रस्तावना :-

वृंदावन मंदिरात प्राप्त होणाऱ्या फुलांच्या निर्माल्यापासून सुगंधी द्रव्ये/सुगंधी जल, गुलाल, धूपबत्ती, अगरबत्ती इ.पर्यावरण पूरक उत्पादने बनविण्यामध्ये उत्तर प्रदेश सरकारने पुढाकार घेतला आहे. मा.सर्वोच्च न्यायालयाने या संदर्भात असेही आदेश दिले आहेत की, जगन्नाथ मंदिर, पूरी आणि वाराणसी इ.मंदिरे अशाप्रकारे पुढाकार घेऊ शकतात. मा.सर्वोच्च न्यायालयाचे आदेश विचारात घेता सर्व राज्य/केंद्रशासित प्रदेश येथील शासनाने त्यांच्या राज्यातील मंदिरामध्ये प्राप्त होणाऱ्या फुलांचे प्रमाण विचारात घेऊन वृंदावन मंदिराप्रमाणे प्रयोग करणे शक्य आहे का याची पडताळणी करणे गरजेचे आहे. ज्या मंदिरात मोठ्या प्रमाणात फुले अर्पण केली जातात तसेच ज्या मंदिराच्या जवळपास विधवा आश्रम असेल किंवा सभोवतालच्या परिसरातील स्त्रियांना व्यवसाय मिळू शकेल आणि ज्या ठिकाणी तांत्रिक माहिती सहजपणे प्रदान केली जाऊ शकेल, अशा ठिकाणी उपरोक्त प्रयोग करणे अपेक्षित आहे. यास्तव राज्यातील मंदिरांमध्ये प्राप्त होणाऱ्या निर्माल्यापासून सुगंधी द्रव्ये/ सुगंधी जल, गुलाल, धूपबत्ती, अगरबत्ती इ. पर्यावरण पूरक उत्पादने बनविण्याच्या अनुषंगाने राष्ट्रीय महिला आयोगास जलदगतीने माहिती उपलब्ध होऊ शकेल याकरिता राज्यस्तरावर नोडल अधिकारी नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

ज्या मंदिरात मोठ्या प्रमाणावर फुले अर्पण केली जातात तसेच ज्या मंदिराच्या जवळपास विधवा आश्रम असेल किंवा सभोवतालच्या परिसरातील स्त्रियांना प्रशिक्षण देऊन व्यवसाय मिळू शकेल अशा ठिकाणी उपरोक्त प्रयोग करणे अपेक्षित असल्याने सदर प्रयोजनार्थ व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम), बांद्रा (पूर्व), मुंबई यांची समन्वय अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२. समन्वय अधिकारी यांनी राष्ट्रीय महिला आयोगाशी समन्वय ठेवतानाच प्रथमत: राज्यातील सिध्दीविनायक मंदिर-मुंबई, साईबाबा संस्थान-शिर्डी, महालक्ष्मी देवस्थान-कोल्हापूर आणि तुळजाभवानी मंदिर-तुळजापूर या प्रमुख ०४ देवस्थानातील मंदिरामध्ये प्राप्त होणाऱ्या निर्माल्याची विल्हेवाट कशाप्रकारे केली जाते, याचा आढावा घेऊन राज्यात सदर प्रकल्पाची शक्याशक्यता तपासावयाची आहे. तसेच या देवस्थानातील मंदिरांमध्ये निर्माल्यावर प्रक्रिया करण्याचा कोणताही प्रकल्प येथे कार्यान्वित आहे अथवा अशा प्रकारचा कोणताही प्रकल्प देवस्थानाच्या विचाराधीन आहे किंवा कसे, याबाबत प्रत्यक्ष भेट देऊन सर्वेक्षण करुन माहिती घ्यावी. तसेच नव्याने प्रकल्प सुरु करण्याची आवश्यकता आहे का याचीही शक्यता तपासून त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०६२११५४४०८५६३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2018.06.21 15:44:29 +05'30'

**( स्मिता निवतकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ (माविम), बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
६. सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती, (का-१०).